<u>वेतनावरील खर्च नियंत्रित करणे.</u>

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- पदनि-२०१६/प्र.क्र.३०/२०१६/आ.पु.कक्ष**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २५ मे, २०१७.

<u>वाचा :-</u>

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक ०२.०६.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक २३.०९.२०१५.
३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक १७.११.२०१५.
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विसु-१, दिनांक १५.०१.२०१६.
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.०८/विसु-१, दिनांक ११.०२.२०१६.
६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-पदनि-२०१६/प्र.क्र.३०/विसु-१, दिनांक १६.०९.२०१६.

<u>प्रस्तावना :-</u>

दीर्घकालीन वित्तीय स्थैर्यासाठी वेतनावरील खर्चाचा सरासरी दर हा महसूल वाढीच्या सरासरी दरापेक्षा अधिक असता कामा नये हे सर्वसाधारण तत्व पाळणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने नवीन पदनिर्मिती तसेच पदभरती यावर संदर्भ क्र. १ येथील दि. ०२.०६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये निर्बंध घालण्यात आले आहेत. तसेच शासन निर्णय, दिनांक ११.०२.२०१६ व दि.१६.९.२०१६ च्या शासन निर्णयाअन्वये प्रशासकीय विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालयातील मंजूर पदांचा आढावा घेऊन सुधारित आकृतीबंध दि.३० एप्रिल, २०१७ पर्यंत अंतिम करण्याच्या सूचनाही देण्यात आल्या आहेत.

तथापि, वरील शासन निर्णयानुसार प्रशासकीय विभागांकडून प्रस्ताव प्राप्त होत नाहीत असे निदर्शनास आले आहे. यास्तव सर्व प्रशासकीय विभागांकडून आकृतीबंध अंतिम करण्याच्या दृष्टीकोनातून गांभिर्याने प्रयत्न करण्याच्यादृष्टीने खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

<u>शासन निर्णय :-</u>

शासन निर्णय दि.११ फेब्रुवारी, २०१६ नुसार सर्व प्रशासकीय विभागांनी उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेऊन सुधारित आकृतीबंध निश्चित करणे अनिवार्य करण्यात आले आहे. सदर आकृतीबंध अंतिम करण्यासाठी दि.३० एप्रिल, २०१७ पर्यंत दिलेली मुदतवाढ संपुष्टात आली असल्याने आकृतीबंध निश्चित करण्यासाठी दि.३१ ऑगस्ट, २०१७ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात येत आहे.

प्रत्येक विभागाने माहिती तंत्रज्ञानावर आधारित विविध माध्यमातून गतीमानता आणण्यासाठी प्रयत्न करुन एकुण मानव संसाधनांची मागणी ३० टक्क्याने कमी करणे गरजेचे आहे

**जे प्रशासकीय विभाग सेवार्थ / शालार्थ प्रणालीतील मंजूर पदसंख्येत असलेली तफावत व इतर त्रुटी दूर करुन, आकृतीबंध नव्याने अंतिम करुन घेतील, त्याच विभागांना दिनांक ०२.०६.२०१५ च्या शासन निर्णयानुसार तसेच त्यानंतर** (अ) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक २३.०९.२०१५, (ब) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दिनांक १७.११.२०१५ आणि (क) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-२०१५/प्र.क्र.६४/विसु-१, दिनांक १५.०१.२०१६ या **शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या सूचनांनुसार पदभरती करण्यास मुभा राहील.**

**जे प्रशासकीय विभाग आकृतीबंध अंतिम मंजूर करुन घेणार नाहीत, तोपर्यंत त्या विभागांना नवीन पदनिर्मिती तसेच पदभरती करता येणार नाही. तसेच तोपर्यंत पदे रुपांतरित करण्यासही अनुमती देण्यात येणार नाही.**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०५२५१५२२२७४०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Sumit Mullick
Date: 2017.05.29 17:37:21
+05'30'

(सुमीत मल्लिक)
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता,विधानपरिषद /विधानसभा, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
२. सर्व सन्माननीय विधानसभा /विधान परिषद व संसद सदस्य.
३. मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन मुंबई-३५
४. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
५. सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक.
६. मंत्रालयीन सर्व विभाग.
७. मंत्रालयाच्या सर्व विभागाखालील विभाग प्रमुख व प्रादेशिक विभाग प्रमुख.
८. वित्त विभागातील सर्व कार्यासने.
९. प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई.
१०. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई.

११. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
१२. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
१३. प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
१४. आयुक्त,राज्य माहिती आयोग (सर्व)
१५. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई.
१६. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/नागपूर/औरंगाबाद.
१७. राज्य महिला आयोग, वरळी, मुंबई.
१८. सर्व विभागीय आयुक्त.
१९. सर्व जिल्हाधिकारी.
२०. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.
२१. महासंचालक, यशदा, राज भवन आवार, बाणेर रोड, पुणे.
२२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२३. महालेखापाल-१( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र, मुंबई.
२४. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
२५. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
२६. सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्र.२६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली.
२७. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
२८. संचालक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
२९.सह संचालक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई/पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर/अमरावती.
३०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
३२. जिल्हा लेखा परीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा.
३३. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
३४. सर्व लेखाधिकारी, वेतन पडताळणी पथक, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद.
३५. मुख्य अधिकारी, सर्व नगरपालिका.
३६. कार्यकारी अधिकारी, कॅन्टोनमेंट बोर्ड, खडकी/देहू रोड/देवळाली/अहमदनगर.
३७. कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहूरी, जिल्हा अहमदनगर.
३८. कुलसचिव, मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी.
३९. कुलसचिव, कोंकण कृषि विद्यापीठ, दापोली, जिल्हा रत्नागिरी.
४०. कुलसचिव, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला.
४१. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई.
४२. कुलसचिव. पुणे विद्यापीठ, पुणे.
४३. कुलसचिव, नागपूर विद्यापीठ, नागपूर.

४४. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद.

४५. कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.

४६. कुलसचिव, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.

४७. कुलसचिव, अमरावती विद्यापीठ, अमरावती.

४८. कुलसचिव, श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी महिला विद्यापीठ, मुंबई.

४९. कुलसचिव, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगांव.

५०. कुलसचिव, महाराष्ट्र पशु व मत्स्यविज्ञान विद्यापीठ, नागपूर.

५१. कुलसचिव, डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे, रायगड.

५२. बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा हटमेंट, आझाद मैदान, मुंबई.

५३. भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश, सी.डी.ओ. बॅरेक क्र.१, नरिमन पॉईंट, मुंबई.

५४. भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी, ३१४ राजभवन, मुंबई ४.

५५. भारतीय कम्युनिस्ट पार्टी (मार्क्सवादी), महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल, ग्लोब मिल पॅलेस, वरळी मुंबई १३.

५६. इंडियन नॅशनल कॉँग्रेस,महाराष्ट्र प्रदेश कॉग्रेस (आय ) समिती, टिळक भवन,दादर, मुंबई २५.

५७. राष्ट्रवादी कॉँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरिमन पॉईंट, मुंबई २१.

५८. शिवसेना, शिवसेना भवन, दादर, मुंबई २८.

५९. निवड नस्ती, वित्त विभाग (आ.पु.क.).